आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान या योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत.
(लेखाशिर्ष २८०१ ५०८९)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२ / प्र.क्र.०५ / कार्यासन ६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:** २५ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२, दि.०८.०२.२०२३ व दि.१६.०३.२०२३.
२) महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित (महावितरण) यांचे पत्र क्र.मु.अ.(उविप्र)/आदिवासी उपयोजना/निधी मागणी/०३९२२, दि.१३.२.२०२३.
३) ऊर्जा विभाग, नस्ती क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र. १८६/ऊर्जा-५.

**प्रस्तावना :-**

आदिवासी उपयोजनेंतर्गत गडचिरोली, अहमदनगर, यवतमाळ व नंदूरबार जिल्हयात प्रस्तावित एकूण ९ वीज उपकेंद्रांपैकी ६ उपकेंद्रांच्या जागा महावितरण कार्यालयास प्राप्त झालेल्या आहेत. या जागांवर वीज उपकेंद्रांच्या उभारणीसाठी सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पित निधीतून रु.३५००.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत ऊर्जा विभागाकडून संदर्भाधीन क्र.३ अन्वये प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

उपरोक्त प्रस्तावास सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पिय तरतुदींतून वितरणासाठी उपलब्ध मर्यादेत निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ येथील नस्तीवर प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २८०१-वीज या मुख्य लेखाशीर्षाखाली महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान या योजनेंतर्गत कोटगुल, पेरमिली, रेगुंठा, अहेरी, जि.गडचिरोली, देवधरी, जि.यवतमाळ व तोरणमाळ, जि.नंदुरबार येथील उपलब्ध असलेल्या वीज

उपकेंद्रांच्या उभारणीसाठी रु.३५००.०० लाख इतका निधी सन २०२२-२३ च्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतुदींतून खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाज | सदर शा. नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान | २८०१ ५०८९ | ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान | ३५००.०० | ३५००.०० |
| | **एकूण** | | **३५००.००** | **३५००.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.३५००.०० लाख (अक्षरी रुपये पस्तीस कोटी फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, ऊर्जा विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ मधील नमूद शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१६.०३.२०२३ मधील शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१७१८०८२४३४२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c4f0e8608020fad0064f5bd3c615be5666dc0af54fcf5038cc18559d51a472ba,
pseudonym=DDE30B7B971C12AC5E78F6BE2C672CA11B7A98CE,
serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2023.03.25 17:43:42 +05'30'

**( वि.फ.वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, ऊर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७) विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई.
१२) कार्यासन अधिकारी (का-८), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग.